**सोलापूर जिल्ह्यातील बार्शी तालुक्यतील प्रजिमा - २३ मधील २.६०० कि.मी. लांबी दर्जा अवनत करुन त्याऐवजी, ग्रामा-११ व ग्रामा-३३७ ची एकूण ४.१५० कि.मी. लांबी प्रजिमा-२३ मध्ये समाविष्ट करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- रवियो-२०२४/प्र.क्र.३९/नियोजन-२**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :-२८ ऑगस्ट, २०२४

पहावे :-

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे
पत्र क्र. जा.क्र. का-२/रेशा/६३१२/सन-२०२४, दिनांक १२.०७.२०२४.

**प्रस्तावना :-**

सोलापूर जिल्ह्यातील बार्शी व मोहोळ तालुक्यातील -बार्शी- मालवंडी -नरखेड- भोयरे- हिंगणी - भांबेवाडी- शिरापुर रस्ता- प्रमुख जिल्हा मार्ग क्र. २३ ची २.६०० कि.मी. लांबी दर्जा अवनत करुन, त्याऐवजी (१) नरखेड ते खुनेश्वर रस्ता-ग्रामीण मार्ग क्र. ११ ची, १.६५० कि.मी. लांबी तसेच (२) भोयरे ते डिकसळ रस्ता-ग्रामीण मार्ग क्र. ३३७ ची २.५०० कि.मी. अशी एकूण ४.१५० कि.मी. लांबी प्रजिमा-२३ मध्ये समाविष्ट करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रदेशिक विभाग, पुणे यांचा प्रस्ताव विचारात घेऊन, सोलापूर जिल्ह्यातील बार्शी व मोहोळ तालुक्यातील, प्रमुख जिल्हा मार्ग क्र. २३ ची २.६०० कि.मी. लांबी दर्जा अवनत करुन, त्याऐवजी ग्रामीण मार्ग क्र. ११ व ग्रामीण मार्ग क्र.३३७ ची एकूण ४.१५० कि.मी. लांबी प्रमुख जिल्हा मार्ग क्र. २३ मध्ये खालीलप्रमाणे अंतर्भुत करण्यात येत आहे.

सोलापूर जिल्ह्यातील मोहोळ तालुक्यातील बार्शी- मालवंडी- मानेगाव- नरखेड -भोयरे- हिंगणी- शिरापुर रस्ता. प्रजिमा-२३, साखळी क्रमांक- ३८/८०० ते ४१/४०० कि.मी. मधील २.६०० कि.मी लांबी दर्जावनत करुन,

सोलापूर जिल्ह्यातील मोहोळ तालुक्यातील,

(१) ग्रामीण मार्ग क्र.११-साखळी क्रमांक, ०/०० ते १/६५० कि.मी अशी एकूण १.६५० कि.मी. लांबी
(२) ग्रामीण मार्ग क्र.३३७-साखळी क्रमांक ०/०० ते २/५०० कि.मी. अशी एकूण २.५०० कि.मी लांबी

अशी एकूण ४.१५० कि.मी. लांबी प्रमुख जिल्हा मार्ग क्र. २३ मध्ये दर्जोन्नत केल्यास,

एकूण दर्जावनत करण्यात येणारी लांबी २.६०० व एकूण दर्जोन्नत करण्यात येणारी ४.१५० लांबी (४.१५० कि.मी.- २.६०० कि.मी.) अशी एकूण १.५५० कि.मी.लांबी प्रमुख जिल्हा मार्ग क्रमांक-२३ मध्ये समाविष्ट होईल.

परिणामी, सदर रस्ते दर्जोन्नत झाल्यास रस्ते विकास योजना २००१-२१ मधील सोलापूर जिल्ह्यातील प्रमुख जिल्हा मार्ग दर्जाच्या रस्त्यांच्या एकुण लांबीत **१.५५० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (४५४०.९७० + १.५५०) म्हणजेच **४५४२.५२० कि.मी.** इतकी होईल.

सोलापूर जिल्ह्यातील मोहोळ तालुक्यातील प्रमुख जिल्हा मार्ग क्र. २३ मधील साखळी क्रमांक-३८/८०० ते ४१/४०० कि.मी. मधील २.६०० कि.मी. लांबी दर्जावनत केल्यानंतर सदर लांबीचा दर्जा ठरविण्याबाबतचा स्वतंत्र प्रस्ताव मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांनी सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या दिनांक २१ जुलै, २०२३ रोजीच्या शासन परिपत्रकानुसार, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई यांचेकडे सादर करण्यात यावा.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०८२९११२२२८६११८ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANPAT SANDIPAN KACHARE

Digitally signed by GANPAT SANDIPAN KACHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=3021bf955fefd71ffad5dd7c97769147f19aca6383a12fed6cff4849d78e224a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B5B30AEBA818C77E43E7B8BA4BCA0E9F0D137FEAB0BBCB16CACF2D44087E8A76, cn=GANPAT SANDIPAN KACHARE
Date: 2024.08.29 11:37:58 +05'30'

**(ग. सं. कचरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, पुणे.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) जिल्हाधिकारी, सोलापूर.

४) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, सोलापूर. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,क्र.२, सोलापूर.

६) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

७) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

८) निवडनस्ती.